**<u>सुधारित प्रशासकीय मान्यता</u>- फोर्ट, मुंबई येथील सी. टी. ओ. ॲनेक्स इमारतीतील व कस्टमर सर्व्हिस सेंटर ॲन्ड लिगल सेक्शनची जागा मुंबई उच्च न्यायालयास भाडेतत्वावर उपलब्ध करुन देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्र. :- एचसीटी-५२२३/५९७/प्र.क्र.१३८/का.४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ ऑगस्ट , २०२४.

**संदर्भ :-** १) समक्रमांकित, शासन निर्णय, दि. २७/०६/२०२४.
२) प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई यांची पत्रे क्र. C.S./CTO Annex/२३०३,दि. १९/०७/२०२४ व क्र. २५००, दि. ०१/०८/२०२४.

**प्रस्तावना :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई च्या कामकाजात झालेली प्रचंड वाढ विचारात घेऊन, मुंबई उच्च न्यायालयास कार्यालयीन वापराकरिता, भारत संचार निगम लिमिटेडची (बीएसएनएल) फोर्ट, मुंबई येथील सेंट्रल टेलिग्राफ ऑफिस (सी.टी.ओ.) ॲनेक्स इमारतीतील तळ व पहिल्या मजल्यावरील आणि सीटीओ इमारतीतील कस्टमर सर्व्हिस सेंटर ॲन्ड लिगल सेक्शनची, अशी एकत्रित एकूण १०,१६७.०१ चौ.फुट इतकी जागा, प्रती चौ. फुट प्रती माह रु. ४१७/- या दराने, भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास व त्यानुषंगाने येणाऱ्या आवर्ती व अनावर्ती खर्चास संदर्भ क्र.१ येथील दि. २७/०६/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती. यानुषंगाने उच्च न्यायालय प्रशासन व बीएसएनएलचे अधिकारी यांचेत पार पडलेल्या बैठकीस अनुसरुन, सदरहू भाडेकरार रु. ४१७/- या एवेजी रु. ४३८/ प्रति चौ. फुट यादराने करण्यास व त्यानुसार येणाऱ्या खर्चास सुधारित मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव उच्च न्यायालय प्रशासनाने त्यांच्या संदर्भाधीन पत्रांन्वये शासनास मान्यतेकरिता सादर केला आहे. यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

भारत संचार निगम लिमिटेडची फोर्ट, मुंबई येथील सेंट्रल टेलिग्राफ ऑफिस (सी.टी.ओ.) ॲनेक्स इमारतीतील तळ व पहिल्या मजल्यावरील एकूण ८,३५९.७६ चौ.फुट व सीटीओ इमारतीतील कस्टमर सर्व्हिस सेंटर ॲन्ड लिगल सेक्शनची, तळ मजल्यावरील १८०७.२५ चौ. फुट जागा (कारपेट) अशी एकूण १०,१६७.०१ चौ.फुट इतकी जागा, प्रती चौ. फुट प्रती माह रु. ४३८/- या दराने मुंबई उच्च न्यायालयास कार्यालयीन वापराकरिता भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास व

त्यानुषंगाने खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार येणाऱ्या **वार्षिक आवर्ती रु. ६,३०,५६,६०९/-** (पूर्णांकात) (अक्षरी रुपये सहा कोटी तीस लक्ष छपन्न हजार सहाशे नऊ फक्त) इतक्या व **अनावर्ती रु. १,३३,५९,४५१/- (पूर्णांकात) (अक्षरी रुपये एक कोटी तेहतीस लक्ष एकोणसाठ हजार चारशे एकावन्न फक्त)** इतक्या खर्चास तसेच सदर भाडेदरात प्रतिवर्षी ५% वाढ करण्यास, खर्चाची खातरजमा उच्च न्यायालय प्रशासनाने करण्याच्या अटीअधीन, सदर आदेशान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| **खर्चाचे स्वरुप** | **खर्चाची बाब** | **पहिला मजला ३७०६.७१ चौ.फुट + तळ मजला (४६५३.०५+१८०७.२५) ६४६०.३ चौ.फुट अशी एकूण १०,१६७.०१ चौ. फुट** |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| **आवर्ती खर्च** | भाडेदर<br>(प्रती चौ. फूट प्रती माह रु. ४३८/- याप्रमाणे) | मासिक :- रु. ४४,५३,१५०.३८/-<br>वार्षिक :- रु. ५,३४,३७,८०४.५६/- |
| | परिचालन आणि देखभाल दुरूस्ती आकार | मासिक भाडेदरात समाविष्ट |
| | वस्तु व सेवा कर<br>(१८% प्रमाणे) | मासिक :- रु. ८,०१,५६७.०६/-<br>वार्षिक :- रु. ९६,१८,८०४.७२/- |
| | **एकूण आवर्ती खर्च<br>(पूर्णांकांत)** | **मासिक :- रु. ५२,५४,७१७/-<br>वार्षिक :- रु. ६,३०,५६,६०९/-** |
| **अनावर्ती खर्च** | सुरक्षा अनामत (बिनव्याजी)<br>(३ महिन्यांच्या मासिक भाडेखर्चाइतकी) | **रु. १,३३,५९,४५१.१४/-**<br>(४४,५३,१५०.३८ X ३) |
| | **एकूण अनावर्ती खर्च (पूर्णांकांत)** | **रु. १,३३,५९,४५१/-** |

२. उपरोल्लेखित प्रति चौ. फुट भाडेदरात प्रतिवर्षी ५% इतकी वाढ होईल. त्यासाठी प्रतिवर्षी मंजूरी देण्यासाठी स्वतंत्र आदेश शासनामार्फत निर्गमित केले जाणार नाहीत.

३. यानुषंगाने संबंधितांशी उचित तो करार त्वरेने करुन, कराराची एक प्रत्र शासनास सादर करावी.

४. याप्रित्यर्थचा खर्च हा "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (भारित), १०२ उच्च न्यायालये (०२)(०१) प्रबंधक, मूळ शाखा, (२०१४ ००७४) १४ भाडे, पट्टी व कर " या लेखाशिर्षाखालील त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा. त्याकरीता विहीत पध्दतीने निधी अर्थसंकल्पित करण्यात यावा.

५. प्रस्तुत आदेश हे वित्तिय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग एक, अनुक्रमांक १०, नियम ११५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये तथा वित्त

विभागाकडील अनौ. संदर्भ क्र. ९१७/व्यय ५, दि. २०/०८/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२११३४७४०४५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2024.08.21 14:02:37 +05'30'

**( विलास व. गायकवाड )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहायक, राजभवन, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री, विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद/विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई ४०००३२.
प्रबंधक (मूळ शाखा), उच्च न्यायालय, मुंबई.
महाव्यवस्थापक (एल ॲण्ड बी), बी.एस.एन.एल. लिमिटेड, सांताक्रुझ (प), मुंबई - ४०० ०५४.
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र-एक, मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय मुंबई.
कार्यासन २३ /२४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.